ग्रामीण रुग्णालय म्हसळा,जि.रायगड येथील मुख्य इमारतीच्या बांधकामास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रशामा २०१३/ प्रक्र-४४८/आरोग्य ३(अ)**
गो.ते.संकुल इमारत, १० वा मजला, ए विंग,
मंत्रालय, एल.टी. मार्ग, मुंबई-४०० ००१.
दिनांक: १७ मार्च, २०१७.

**संदर्भ:-**

१) सह संचालक,आरोग्य सेवा,रुग्णालये (राज्यस्तर)मुंबई यांचे पत्र क्रमांक :संआसे कक्ष-३/टे-६ /ग्रारुम्हसळासुप्रमा /१८५३२-३३ /१६,दि. ३.११.२०१६.

२) शासन निर्णय क्रमांकः सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.ग्रारुम्ह-२००९/प्र.क्र.४२२/०९ आरोग्य-४, दि.२७ ऑगस्ट,२००९.

**शासन निर्णय:-**

ग्रामीण रुग्णालय म्हसळा,जि.रायगड येथील मुख्य इमारतीच्या बांधकामास संदर्भाधीन शासननिर्णयान्वये रु.१,९५,२६,०००/- इतक्या रकमेची प्रशासकीय मान्यता यापूर्वीच देण्यात आलेली आहे. ग्रामीण रुग्णालय म्हसळा,जि.रायगड येथील मुख्य इमारतीच्या बांधकामाचे क्षेत्रफळ वाढल्याने रु. ३,९४,७९,९५५/- इतक्या रकमेच्या सुधारित अंदाजपत्रक व आराखडयास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यास अनुसरुन ग्रामीण रुग्णालय म्हसळा,जि.रायगड येथील मुख्य इमारतीच्या बांधकामाच्या रु. ३,९४,७९,९५५/- इतक्या सुधारित अंदाजपत्रक व आराखडयास (मूळ प्रशासकीय मान्यतेवरील रु.१,९९,५३,९५५/- इतक्या अधिक्यास) खालील अटी व शर्तींच्या अधिन राहून या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

**अटी व शर्ती-:**

१. कामासाठी निविदा मागविण्याआधी सदर कामास सार्वजनिक बांधकाम विभागातील सक्षम अधिकाऱ्यांची तांत्रिक मंजुरी घेणे आवश्यक राहील.
२. सदर कामाची निविदा काढतांना प्रत्येक कामाची स्वतंत्रपणे निविदा न काढता नमूद सर्व कामांसाठी एकच निविदा काढण्यात यावी.
३. क्षेत्रिय जागेच्या परिस्थितीनुसार व आरोग्य संस्थांच्या आवश्यकतेनुसार प्रस्तावित कामाची किंमत वाढणे शक्य असल्यामुळे त्यासाठी आवश्यक प्रस्ताव सार्वजनिक बांधकाम विभागाच्या त्या-त्या भागाच्या क्षेत्रिय अधिकाऱ्यांकडून करुन घ्यावेत.
४. सदरचे अंदाजपत्रक हे ढोबळ नमुना अंदाजपत्रक असल्याने, या कामांच्या सविस्तर अंदाजपत्रकांना तांत्रिकदृष्ट्या मान्यता ही सार्वजनिक बांधकाम खात्याच्या त्या त्या क्षेत्राच्या

सक्षम अधिकाऱ्यांकडून करण्यात येईल. अशी तांत्रिक मान्यता करीत असताना आरोग्य खात्याच्या त्या-त्या आरोग्य सेवा मंडळाच्या उपसंचालकांच्या सहमतीने तरतुदी अंतिम करण्यात याव्यात.

५. प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग,शासन निर्णय, क्र.इएनव्ही-२०१३/ प्र.क्र.१७७ / तां.क.१, दि.१० जानेवारी,२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

६. सदर कामाचा खर्च सार्वजनिक आरोग्य विभागाने त्यांच्याकडे उपलब्ध असलेल्य नियतव्ययामधून भागविण्यात यावा.

२. ग्रामीण रुग्णालय म्हसळा,जि.रायगड येथील मुख्य इमारतीच्या रु.१,९९,५३,९५५/- इतक्या रकमेच्या बांधकामाचा खर्च, मुख्यलेखाशिर्ष "४२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य यावरील भांडवली खर्च, ०२- ग्रामीण आरोग्य सेवा, १०४-सामुहिक आरोग्य केंद्र, (००)(०१)प्रमुख बांधकामे (४२१००३९१), (००)(०२) आस्थापना खर्च (४२१० ०४०८) (००)(०३) हत्यारे व संयंत्रे यावरील खर्च (४२१००४१७ )५३-मोठी बांधकामे" या लेखाशिर्षातून भागविण्यात यावा. सदर कामासाठी लागणा-या रकमेची अर्थसंकल्पात तरतूद करण्याचा प्रस्ताव संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांनी त्वरीत शासनास सादर करावा.

३. हे आदेश शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक- विअप्र २०१३/प्र.क्र.३०/विनियम, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्ट, भाग पहिला, उपविभाग-पाच मधील अनुक्रमांक-१, परिच्छेद क्रमांक-१३४ अन्वये नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३१७१७५२४८१०१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Arun Vithoba Kadam

Digitally signed by Arun Vithoba Kadam
DN: cn=Arun Vithoba Kadam, o=Mantralay, ou=PHD, email=arun.kadam@nic.in, c=US
Date: 2017.03.17 18:34:51 +05'30'

(अ.वि.कदम)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. महालेखापाल,महाराष्ट्र-१/२(लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता),मुंबई/नागपूर.
२. आयुक्त,आरोग्य सेवा तथा संचालक,राष्ट्रीय आरोग्य अभियान,मुंबई

३. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
४. सह संचालक आरोग्य सेवा (रुग्णालये-राज्यस्तर) मुंबई
५. संनियंत्रक तथा मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई
६. उपसंचालक,आरोग्य सेवा मुंबई मंडळ,ठाणे,
७. उपसंचालक,आरोग्य सेवा (नियोजन) मुंबई
८. जिल्हा शल्य चिकीत्सक,सामान्य रुग्णालय,रायगड,
९. कार्यकारी अभियंता,सार्वजनिक बांधकाम विभाग,महाड,जि.रायगड
१०. उप विभागीय अभियंता,सार्वजनिक बांधकाम विभाग,श्रीवर्धन,जि.रायगड
११. जिल्हा कोषागार अधिकारी,रायगड-अलिबाग
१२. कार्यासन अधिकारी,सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-३), मंत्रालय, मुंबई.
१३. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. अवर सचिव,(आ.३),सार्वजनिक आरोग्य विभाग,मंत्रालय,मुंबई
१५. निवडनस्ती (आरोग्य-३अ).